कोकण विकासाच्या सुधारित कार्यक्रमांतर्गत
सिंधुदूर्ग जिल्हयातील पर्यटन स्थळाचा
विकास करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००३/६/प्र.क्र.३१७/भाग-३/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ०३ मार्च, २००४.

**वाचा:-** १) आयुक्त, कोकण विभाग यांचे पत्र क्र.नियोजन/कार्या-१/प्र.क्र.८३-ब/पर्यटन, २००३, दिनांक १३.१०.२००३.

**प्रस्तावना:-** आयुक्त, कोकण विभाग यांनी कोकण विकास सुधारित कार्यक्रमांतर्गत पर्यटन विकासांतर्गत प्रस्ताविलेली कामे व अंदाजपत्रकीय रक्कम खालील तक्त्यात दर्शविण्यात आली आहेत:-

| अ.क्र. | तालुका | कामांचे नांव | अंदाजपत्रकीय रक्कम रुपये (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | वेंगुर्ला | बेळागर सागर तिर्थ रस्ता डांबरीकरण करणे | १८.७३ |
| २ | | टाक वेळागर रस्ता डांबरीकरण करणे. | ४.७९ |
| ३ | | तळवडे मोतोंड कमाण बासोली टाक रस्ता नुतनी करण करणे. | ६.१७ |
| ४ | | आरवली सोन्सुरे रस्ता डांबरीकरण करणे | ८.४७ |
| ५ | | मोचे डोमरी येथे स्ट्रीट लाईट बसविणे | ०.१५ |
| ६ | | आरवली वेतोबा मंदीर पाणी पुरवठा योजना | ४.१४ |
| ७ | | आरवली ग्रामीण पाणी पुरवठा योजना | ५.१६ |
| ८ | मालवण | मालवण धक्का जेटी येथे हायमास्ट बसविणे | १.९९ |
| ९ | वेंगुर्ला | १) नगरपरिषद हद्दीतील एस.टी.स्टॅन्डच्या बाजूला बागेचा विकास करणे. | १०.७९ |
| १० | | २) वेंगुर्ला नगर परिषद हद्दीत डॉ.खान सातेरी मंदीर ते घाडीवाडा वेतोबा मंदीर रस्ता डांबरीकरण करणे. | ५.२८ |
| ११ | | ३) वेंगुर्ला नगर परिषद हद्दीतील नारखण तलाव रस्ता (गणपती मंदीराकडून जाणारा रस्ता) डांबरीकरण करणे. | ०.५४ |
| १२ | | ४) वेंगुर्ला नगर परिषद हद्दीतील नांदोस्कर रस्ता प्रिमिक्स पध्दतीने डांबरीकरण करणे. | १.१९ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | | ५) वेंगुर्ला नगर परिषद हद्दीतील भुजनाकवाडी रस्ता प्रिमिक्स पध्दतीने डांबरीकरण करणे. | ०.५८ |
| | | एकूण | ७५.९८ |

जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी त्यांच्याशी संबंधित उपरोक्त तक्त्यात दर्शविलेल्या कामांना तांत्रिक मान्यता घेण्याच्या अटीवर दिनांक १०.१०.२००३ च्या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता दिली आहे.

**निर्णय:-** सुधारित कोकण विकासाच्या कार्यक्रमांतर्गत कोकणातील पर्यटनाच्या विकासासाठी व सुविधा निर्माण करण्यासाठी सन २००३-२००४ या आर्थिक वर्षात वरील तक्त्यात नमूद केलेल्या कामांसाठी तांत्रिक मान्यता घेण्याच्या अटीवर एकूण रुपये ७५.९८ लाख (रुपये पंच्याहत्तर लाख अठ्याण्णव हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांना वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. उपरोक्त मंजूर करण्यात आलेला खर्च हा "३४५२-पर्यटन-मागणी क्र.बी-७-०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा-१०१ पर्यटन केंद्रे-(०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) (१९) पर्यटन विकासासाठी अ,ब,क श्रेणीमध्ये वर्गीकृत केलेली ठिकाणे" या लेखाशिर्षाखाली सन २००३-०४ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी सदरची रक्कम संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला तात्काळ सुपूर्द करावी व सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सामाजिक,भौतिक प्रगती तसेच सुपूर्द करण्यात आलेल्या रकमेचे विनियोजन दर्शविणारे विवरणपत्र इत्यादीचा अहवाल दरमहा १० तारखेपर्यन्त न चुकता शासनास सादर करावा.

४. या प्रयोजनासाठी जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांना "आहरण व संवितरण व नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी याबाबतीत विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून रक्कम आपल्या ताब्यात घेऊन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी. मंजूर करण्यात आलेल्या रुपये ७५.९८ लाख (रुपये पंच्याहत्तर लाख अठ्याण्णव हजार फक्त) चे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखाकार (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना सादर करावे, व त्याची एक प्रत शासनास न चुकता सादर करावी. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. या कामाचे संपूर्ण नियंत्रण आयुक्त, कोकण विभाग/जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी करावयाचे आहे.

६.	जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून काढल्यानंतर त्यासंबंधीच्या देयकाचा प्रमाणक क्रमांक, देयकाची रक्कम, कोषागाराचे नाव, दिनांक इत्यादी माहिती खर्चमेळ घालून शासनास सादर करावी.

७.	सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-६८/२००४/व्यय-८, दिनांक २०.२.२००४ व क्रमांक ५०६/अर्थोपाय, दिनांक २१.२.२००४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ब. नेलावडे )
अवर सचिव,गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई.
महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपूर.
महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (पर्यटन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
जिल्हाधिकारी, जि. सिंधुदुर्ग,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, जि.सिंधुदुर्ग,
सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
नियोजन विभाग, कार्यासन १४१२, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, व्यय-८ / अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, पर्यटन.